**राज्य नदी संवर्धन योजनेतंर्गत नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड येथील गोदावरी नदी संवर्धन प्रस्तावास निधी वितरण करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रानयो २०२२/प्र.क्र. ८३/आस्थापना - अ**
नवीन प्रशासकीय इमारत, १५ वा मजला,
मंत्रालय, मुंबई - ३२.
दिनांक-०४ मार्च,२०२४

**वाचा -**

१) पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाचा समक्रमांकाचा शासन निर्णय, दि.३१.०३.२०२२
२) आयुक्त, नांदेड-वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांचे पत्र क्र.जा. क्र,नांवाशमनपा/ मवनिस्सारण/ ७४८१/२०२३, दि.०७.०९.२०२३ व पत्र क्र. क्र.जा.क्र,नांवाशमनपा/मवनिस्सारण/१५५०८/२०२४, दि.२०.०२.२०२४

**प्रस्तावना -**

पर्यावरण व वातावरणीय बदल विभागाच्या उपरोक्त संदर्भिय क्र. १ च्या शासन निर्णयान्वये राज्य नदी संवर्धन योजनेतंर्गत आयुक्तनांदे ,वाघाळा महानगरपालिका-नांदेड ,ड यांच्याकडून प्राप्त गोदावरी नदीचे पर्यावरणीयदृष्ट्या संवर्धन करण्याच्या एकूण रु .१७,४१,३३,८९१इतक्या रकमेच्या प्रस्तावास -/ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती) त्यामध्ये राज्य शासनाचा हिस्सा .८०%) रु .१३,९३,०७,११३रूपये तेरा कोटी) -/ त्र्यानऊ लक्ष सात हजार एकशे तेरा फक्त एवढा आहे व नांदेड महानगरपालिकेचा हिस्सा रुपये ( ३,४८,२६,७७८/- एवढा आहे.दि .३१.०३.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रथम हप्त्यापोटी रुपये ६,९६,५३,५५६/- इतका निधी आयुक्तनांदेड यांना वितरित करण्यात ,वाघाळा महानगरपालिका-नांदेड , .आलेला होता आयुक्त, नांदेड-वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांच्या दि.०७.०९.२०२३ रोजीच्या पत्रान्वये राज्य हिश्यापैकी प्रथम हप्त्यापोटी वितरित केलेला रुपये ६,९६,५३,५५६/- इतका निधी पूर्णपणे खर्च झाल्याबाबत विभागास कळविले आहे. तसेच सदर योजनेंतर्गत मंजूर कामांपैकी पूर्ण झालेली कामे ही गुणवत्तापूर्ण असल्याबाबत अहवाल दि.२०.०२.२०२४ रोजीच्या पत्रासोबत सादर केला आहे व उर्वरित निधीचा पुढील हप्ता वितरित करण्याबाबत विनंती विभागास केलेली आहे. आता, राज्य हिश्यापैकी उर्वरित रुपये ६,९६,५३,५५७/- पैकी रुपये ५,३२,३६,७०३/- (अक्षरी पाच कोटी बत्तीस लक्ष छत्तीस हजार सातशे तीन फक्त) इतका निधी दुसरा हप्ता म्हणून वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

राज्य नदी सवंर्धन योजनेतंर्गत गोदावरी नदी सवर्धनासाठी द्वितीय हप्त्यापोटी रुपये ५,३२,३६,७०३/- (अक्षरी पाच कोटी बत्तीस लक्ष छत्तीस हजार सातशे तीन फक्त) इतका निधी आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका, नांदेड यांना वितरीत करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर प्रयोजनार्थ होणारा खर्च हा मागणी क्र. यु - ४, ३४३५ परिस्थितीकी व पर्यावरण, १९२, नगरपरिषदांना सहाय्य, (०१) पर्यावरण संरक्षण, (०१) (०१) राज्य नदी संवर्धन योजना (कार्यक्रम) (३४३५ १३२९), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या मुख्य- लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याच लेखाशिर्षाखाली वर्गीकृत करण्यात यावा.

३. आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका यांना अदा करावयाची रू. ५,३२,३६,७०३/- (अक्षरी पाच कोटी बत्तीस लक्ष छत्तीस हजार सातशे तीन फक्त) एवढी रक्कम अधिदान व लेखाधिकारी यांच्यामार्फत कोषागारातून वित्त विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. संकीर्ण २०२०/प्र. क्र.६/२०/कोषा-प्रशा ५, दि १२.११.२०२१ अन्वये ई-कुबेर प्रणालीद्वारे थेट आयुक्त, नांदेड - वाघाळा महानगरपालिका यांच्या बँक खाते-COMMISSIONER AND CHIEF ACCOUNTS OFFICER NWMC NANDED, क्र.०००००००३९४६७३११८७०, IFSC CODE-SBIN००२००४९ मध्ये जमा करावे. प्रस्तुत प्रकरणी श्री. किशोर मो. सोईतकर, कार्यासन अधिकारी, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून व श्री. सु.कि. निकम, सहसचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय यांना नियंत्रक अधिकारी म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्रक्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच त्यातील अटी व शर्तीनुसार निर्गमित करण्यात येत आहे. प्रमाणित करण्यात येते की, सदर दिनांक १२ एप्रिल, २०२३ रोजीच्या शासन निर्णयाच्या परिशिष्टातील अनु.क्र. २ व ९ मधील अटींची पुर्तता होत आहे.

I) वित्त विभागाच्या उपरोक्त परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मधील ३१ वेतनेतर सहायक अनुदाने या बाबीखालील खर्च करण्यास विभागाला अधिकार प्राप्त झाले असून सदर परिपत्रकातील नमूद अटींची पूर्तता करण्यात आली आहे.

II) वित्त विभागाच्या उपरोक्त परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक १,३,४,५,६,७ व ८ या प्रकरणी लागू नाही. तसेच सदर परिशिष्टातील अनुक्रमांक ४ बाबत नमूद करण्यात येते की ही योजना केंद्र पुरस्कृत बाहय सहाय्यित योजना नाही.

III) वित्त विभागाच्या उपरोक्त परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक २ च्या अनुषंगाने नमूद करण्यात येते की, सदर योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये कसलाही बदल करण्यात आलेला नाही. तसेच परिशिष्टातील अ.क्र.९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक १,२,३ व ४ मध्ये नमूद करण्यात आलेल्या अटींची पूर्तता होत आहे. तसेच सदर अनुक्रमांक ९ संदर्भातील तपासणी सूचीमधील अनुक्रमांक ५ ते १० या प्रकरणी लागू नाही.

५. या शिवाय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण २०१६/प्र. क्र.३१/कोषा.प्रशा-५, दिनांक १०.०५.२०१६ अन्वये अनुक्रमांक “अ” मधील खालील बाबींची पूर्तता होत आहे.

**१) गोदावरी नदी संवर्धनासाठी रु. ५,३२,३६,७०३/- (अक्षरी पाच कोटी बत्तीस लक्ष छत्तीस हजार सातशे तीन फक्त) इतका निधी प्रस्तुत शासन निर्णयाव्दारे वितरित करण्यात येत आहे. सदरनुसार देण्यात येणारे अनुदान सशर्त आहेत्यानुसार सदर वितरित केलेला निधी खर्च झाल्याचे उपयोगिता प्रमाणपत्र विभागास . .सादर केल्यानंतर निधीचा पुढील हप्ता वितरित करण्याच्या शर्तीसह वितरित करण्यात येत आहे**

२) “मागणी क्र.यु-४, ३४३५-परिस्थितीकी व पर्यावरण, ०४, प्रदुषण प्रतिबंध व नियंत्रण, १०३, वायू व जल प्रदूषण प्रतिबंध, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-राज्य योजनांतर्गत योजना, (०२) पर्यावरण प्रतिबंध (०२) (०७) राष्ट्रीय सरोवर संवर्धन योजना (३४३५ ०१८२) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)”या मुख्य लेखाशिर्षाखाली कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

३) आयुक्त नांदेड ,वाघाळा महानगरपालिका-नांदेड ,यांच्याकडून पर्यावरण व वातावरणीय बदल विभागास कोणतेही येणे बाकी नाही.

४) तसेच उपरोक्त शासन निर्णयाच्या अनुक्रमांक “अ” मधील क्रमांक ६,७,८ व ९ येथील बाबी लागू नाहीत.

६. प्रस्तूत शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं-२०२३/प्रक्र.४०/अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३०४१५००३२७४०४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SURYAKANT
KISAN NIKAM

Digitally signed by SURYAKANT KISAN NIKAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=ENVIRONMENT AND CLIMATE CHANGE DEPARTMENT, 2.5.4.20=3978ce8e745a91e0561f6f9473df7e92873ee7ac8c2f7c49ac520e61061ddded, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3A94A1F658A34D45CA2859DBC88DFB40760079B8946087EF0FB8BC7CD7314C27, cn=SURYAKANT KISAN NIKAM
Date: 2024.03.04 15:10:14 +05'30'

**( सु.कि. निकम )**
**सह सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल)**
**महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राज भवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री (पर्यावरण व वातावरणीय बदल ) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
४. प्रधान सचिव (पर्यावरण व वातावरणीय बदल), मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सह सचिव, पर्यावरण व वातावरणीय बदल, मंत्रालय, मुंबई.
८. आयुक्त, नांदेड-वाघाळा महानगरपालिका, जि. नांदेड.
९. महालेखापाल (लेखापरिक्षा) १. महाराष्ट्र मुंबई-४०००२०.
१०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई- ४०००२०.
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
१२. महालेखापाल (लेखापरिक्षा) २. महाराष्ट्र, नागपूर.
१३. अधिदान व लेखाधिकारी, वांद्रे (पूर्व) मुंबई-४०००५१.
१४. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
१५. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
१६. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई.
१७. मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधीलेखा, कोकण भवन, मुंबई.
१८. वित्त विभाग (कार्यासन क्रमांक व्यय-१६/अर्थसंकल्प-७), मंत्रालय, मुंबई.
१९. नियोजन विभाग, कार्यासन क्र.१४७२, मंत्रालय, मंबई.
२०. रोखशाखा, पर्यावरण व वातावरणीय बदल विभाग, मंत्रालय, मुंबई.